


₹ 18.00 ISBN 978-81-237-3404-0

नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

नवसाक्षर साहित्यमाला

# बन्सीधर! तू आता कुठे रे जाशील?

श्री. म. माटे

नवसाक्षर साहित्यमाला

# बन्सीधर!
# तू आता कुठे रे जाशील?

श्री. म. माटे

चित्रे
शशी शेट्ये




नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

ISBN 978-81-237-3404-0

पहला संस्करण : 2000

चौथी आवृत्ति : 2013 *(शके* 1934)



Original : Bansidhara! TuAta Kathe Re Jashil? *(Marathi)*
Translation : Bansidhar! Ab too kahan jayega re? *(Hindi)*

**₹ 18.00**

निदेशक, नेशनल बुक ट्रस्ट, इंडिया
नेहरू भवन, 5 इंस्टीट्यूशनल एरिया, फेज-II
वसंत कुंज, नई दिल्ली-110 070 द्वारा प्रकाशित

सातारा जिल्ह्यात लेंगरे गावापासून दोन मैलांच्या अंतरावर एका ओढ्याच्या काठी कातकऱ्यांचा तळ पडलेला होता. सरासरी दहाबारा झोपड्या असतील. पाचपंचवीस कोंबडी इकडे तिकडे कीड टिपीत फिरत होती; आणि दहाबारा गाढवे अर्धवट डोळे मिटून भर उन्हात दिडक्या पायावर उभी होती. या कोंबड्या-गाढवांच्या मध्येच दोन म्हशी आणि एक कालवड खुंट्याला बांधलेली होती व त्यांच्यापुढे थोडे थोडे हिरवे बाटूक पडलेले होते. लांडग्यांसारखी क्रूर दिसणारी पण वाळकी, चोपलेली, आणि लांबोळी पाचसहा कुत्री आसपास धापा टाकीत होती.

झोपड्यांच्या ऐपतीवरून आत दारिद्र्याने वसती केली असावी असे वाटले असते, पण चमत्कार असा की, लांबून समोरून जाणारा एखादा कोरा जरीचा फेटा, एखादा चाकोलेट रंगाचा झुळझुळीत मफलर, किंवा एखादी काळी कातडी ट्रंक, या नाही तर त्या झोपडीत, दिसत असे.



बायकांच्या केसांच्या आणि पुरुषांच्या दाढीच्या जटा झालेल्या होत्या हे खरे; पण एखाद्या बाईच्या अंगात रेशमी खणाची उंची चोळी आणि पुरुषाच्या कमरेला लाल चवकट्यांचा रेशमी धडपा गुंडाळलेला असे.

झोपड्यांची सावली ती किती पडणार? पण तिच्यातच बराचसा पोरांचा चिघोर गोंगाट करीत बसला होता; आतून पुरुषांचे घोरणे ऐकू येत होते. मधून मधून साधारण पोशाख केलेला पण रोखून पाहणारा एखादा उर्मट नजरेचा माणूस या झोपड्यांवरून टेहळत जात असे.

वसतीपासून बऱ्याच अंतरावर थोडा झाडोरा होता. वसतीतली आठदहा ठणक पोरे तेथे पक्ष्यांची घरटी हुसकून काढीत होती. पोरे काळी, बेडौल अंगाची, घाणेरडी, अंगावर ओरखडे उठलेली अशी होती. आपल्यापैकीच एकाला ती 'बंछी, बंछी' म्हणून हाका मारीत होती.

*

बंछी सुमारे बारा वर्षांचा असावा. उन्हाने आणि उघड्यावरच्या वापराने त्याचा चेहरा रापला असला तरी तो लालवट गोरा होता; नाक काहीसे लांब

असून, कपाळातून निघताच उचललेले असल्यामुळे, त्याचा रुंदट चेहरा सुशोभित दिसे; बंछीचे डोळे घारे-बदामी रंगाचे असून, उन्हाच्या तिरपीने त्यांत तांबड्या रेषा उमटलेल्या होत्या; त्याच्या डाव्या गालावर लहानसे निळसर ल्हासे असून ओठ सारखे मिटून धरण्याची त्याला सवय होती; गेल्या दोन वर्षांपासून त्याच्या हनुवटीवर एक लांबच्या लांब वण पडला होता; जसा काही काटेऱ्याने निघालेला खोल ओरखडा भरून निघाला आहे; मांडीपासून त्याच्या पायाचा घाट व पावलांचा मलिन सुकुमारपणा शहरात शाळेत जाणाऱ्या मुलालाच शोभला असता.

बंछी बोलू लागला म्हणजे त्याच्या आवाजाची पातळ किनारी एखाद्या आडवळणी गोठ्यात पॅरिसची पेटी वाजवावी तशी ऐकू येई; रानावनातून एकटेदुकटेही पळावे आणि प्रसंग पडल्यास मागून खावे हे त्याच्या अंगवळणी पडले होते.

ओढ्याच्या काठी बसून आपले धुळीने भरलेले आणि ओरखड्यांनी भेगाळलेले अंग त्याने दगडाने खरखरून घासून धुतले म्हणजे मळलेला तांबूस ताप्ता धुवावा तसा तो दिसे.



झाडोऱ्यातील घरटी हुसकताना तो इतर पोरांबरोबर असला तरी दूरदूरच असे; अंडी किंवा पिले सापडली म्हणजे बेम्ट्या, तवळ्या, धाक्या ही पोरे आनंदाने नाचू लागत, पण बन्सीला कसेसेच वाटे. ती सगळी मुले त्याला भारी भजत; त्याच्याभोवती उभी राहून ती त्याच्या तोंडाकडे पाहात, तो सांगेल ते ती ऐकत; तो एखादे वेळी दमला-भागला तर हाताची पालखी करून ती त्याला घरी नेत.

*

बेम्ट्याच्या बापाचे नाव 'चिम्या' होते. नाव केविलवाणे असले तरी हा चिम्या मोठा आडदांड, पुंड आणि महातामसी असे. सगळ्या वसतीला त्याचा वचक असे. तो एकदा गर्जू लागला म्हणजे सगळे भामटे चिडीचीप होत. त्याचे लाल डोळे, त्याची करडी दाढी, भुभुक्कार करीत बोलण्याची त्याची तऱ्हा आणि त्याच्या हातात सदैव असलेला तो गुप्तीचा सोटा यांना देव भ्याला असता—मग पीरांची काय कथा!

इतर मुलांबरोबर बन्सी इकडे तिकडे गेला तरी चिम्याचे लक्ष त्याच्यावर असे. मात्र त्याने त्याच्या अंगाला कधी बोट लावले नाही. तुळशीला तो पुन्हा

पुन्हा ताकीद देई की, बन्सीला तू वाईट वाकडे खायला घालू नको. बंछी निजला म्हणजे चिम्या सौम्य नजरेने त्याच्याकडे पाहात बसे. मग त्याचे डोळे भरून येत.

नवऱ्याची ही स्थिती पाहून तुळशीलाही गहिवर येई. तिचा धाक्या तिला प्रिय होताच; पण या चुकल्या वासरावर तिचे भारीच प्रेम असे. धाक्याला जवळ घेऊन तुळशीने त्याचा मुका घेतला म्हणजे बंछीला पोटात काही ऊन ऊन आहे असे वाटे. रात्रीच्या वेळी त्याच्या मनात काही चमत्कारिक चलबिचल चालू असे; तरी डोळे मिटून गप्प पडण्याची सवय त्याला झाली होती.

तो असाच एकदा निजला असताना चिम्या तुळशीला म्हणाला, ''कुणाचं प्वार अन् कुठं पडलंया! कारबारनी! ह्येला नीट संभाळ. आपून काई पातक केलं! म्हादेवाच्या डोंगरात वांदरं मारून खाल्ली : काय र नशिबा! पोरं पटापट मराई लागली. रायाची वांदरं मारून खाल्ली!'' असं म्हणून चिम्याने कपाळ बडवून घेतले.

''कारबारनी, जरीमरीनं तडाका दिला : प्वारं पटापट मेली. येताळ जरीमरी आता जरा निवल्यावानी झाल्याती. ह्ये बग, या द्येवमानसाला नीट्ट संबाळ : अग ह्यो द्येवाचा बाळ हाइ : ह्येला घव्हांचा तुकडा घाल; मास्कांड घालू नग,'' असे म्हणून चिम्या गहिवरून आला आणि त्याने आपला हात बंछीच्या पायाला लावून त्याला नमस्कार केला.

त्या नवरा-बायकोनी बंछीचा संभाळ बरा केला. पण बंछी मात्र थोडा सुकत चालला होता. तो राकट चिम्याकडे उदास नजरेने पाही; मायाळू तुळशीकडे वेड्यासारखा पाही. बेम्ट्या पवळ्या इत्यादिकांच्या संगतीत कोठे असला तरी तो लांब डोंगराकडे पाही व सुस्कारा सोडी, रानावनातून या रानवटांच्या झुंडीत फिरतानाही त्याला दुसरी कसली तरी ओढ लागलेली असे.

एकदा काही भिकारी या तळावर भीक मागत आले. आपल्या भिकाऱ्यांना भिकेस कोठे जावे याचा काही विवेकच नसतो. ''दान पावले, दान पावले'' अशी अगाऊ पावती देत, नाही तर ''उलट उलट माघारा प्राण्या! का गोते खाशी'' अशी इशारत देत, ते एखाद्या भिकार खोपटापुढे उभे राहतील. मग हे फिरते कातकरी तरी त्यांच्या तावडीतून कसे सुटतील!



भिकारी खरे पण नेहमीच्याहून कोणी तरी निराळे आले, म्हणून सगळी मुले त्यांच्याभोवती जमा झाली. बन्सीही सगळ्यांच्या मागे उरावर हाताची चवकट करून उभा होता. आपली गावठी सारंगी कानाशी लावून कानफाट्याने 'बिकट वाट' या चालीचे पद म्हटले—

पहा ज़िवाला पडली भूली,
चुकली त्याची वाट खरी; ॥
घर जरि यांचे अनंतरामी,
प्रपंचधामी प्रीत करी!
आई देवकी, दाइ यशोदा,
तिला चिकटतो हा वेडा!
मर्म समजुनी कर्म करावे,
प्राणी सारे भ्रम सोडा! ॥

पद ऐकताना बन्सीला चित्तात विलक्षण कालवाकालव चालू झाली. त्याला अतिशय हुरहुर वाटू लागली. ती त्याला दाबूनही ठेवता येईना. ओंजळभर जोंधळे अन् एक कोरा मफलर तुळशीने भिकाऱ्याला देऊन टाकला.

पोरे आपापल्या झोपडीकडे गेली. अंधार पसरू

लागला. कुत्री भुंकू लागली. माळावरच्या उजेडानेच माणसांची हालचाल चालू राहिली. पाच सहा दांडगे गडी अंधारातून कोठे तरी गेलेसे दिसले. धाक्या, पवळ्या गुरगटून पडले.

बंछी थोडा दूर एका रकट्यावर चुळबुळत पडला. रात्री दोन वाजण्याच्या सुमारास कोणी पुरुष मंडळी आल्याची चाहूल लागली. सगळीकडे निजानीज झाली. रातकिड्यांच्या आवाजापलीकडे आवाज उरला नाही.

सकाळी माळावर उन्हे लवकर पडतात. तुळशी प्रथम उठली. बाजूस पाहते तो अंथरुणावर बंछी नाही.

❋

जयपाळ सकाळी नऊच्या सुमारास बाजारातून परत येत होता. सांगोले काही फारसे मोठे गाव नाही. पण उत्तर हिंदुस्थानातील काही काही पुरभय्यी कुटुंबे इकडच्या टापूत कायम झाली होती.

जयपाळ बाजारातून परत येत होता. ओझ्याचा बोजा गड्याच्या डोक्यावर दिला होता व सहज मिळाल्या म्हणून घेतलेल्या दोन भाजीच्या पेंढ्या त्या बोजावर त्याने ठेवल्या होत्या.



ओझे हलके पडावे म्हणून शरीराला लहान उभे झोके देत हेलकरी चालला होता. त्या झोक्याने वरच्या पेंढीतील एक पेंढी खाली पडली.

जयपाळाचे लक्ष मागे होतेच. पेंढी पडली म्हणून हेलकऱ्यास थोडे चमकावून तो ती उचलण्यास जाणार तो बारा तेरा वर्षांच्या एका ओंगळ मुलाने ती उचलली.

'ए पुरा' म्हणून जयपाळाने ती त्याच्या हातातून घेतली व हेलकऱ्याच्या डोक्यावर नीट ठेवून तो पुन्हा चालू लागला.

त्याला काय वाटले कुणास ठाऊक, पण त्याने मागे वळून पाहिले, तो मुलगा मागून येतच होता. तो ओंगळ, दमलेला दिसत होता. त्याच्या काखेला झोळी होती. त्याने पुन्हा वळून पाहिले; आजूबाजूला पाहिले. घर जवळ आलेच होते.

जयपाळचा चेहरा थोडा बावरला. ल्हासे तेच; पण हनुवटीवर ओरखडा नव्हता. पाटीवाल्याला त्याने पुढे चालू केले व त्या मुलाकडे बारकाईने वळून पाहिले. जयपाळाने एक घुटका गिळला आणि अर्धवट वळून तो उभा राहिला. मुलाचे डोळे डबडबले.

“कुठला रे तू?”

“इथलाच.”

“नेहमी इथंच असतोस?”

“नाही, काल रात्री आलो.”

“कुणाचा तू?”

“बाबा, मी तुमचाच.” म्हणून बन्सीधराने बापाच्या कमरेला मिठी मारली. दोनही हात पसरून जयपाळाने त्याला पोटाशी गुंडाळून घेतले.

‘बन्सी बन्सी’ म्हणून त्याने त्याला उचलूनच घरात नेले. बाप-लेक ओक्साबोक्शी रडू लागले.

“सहा वर्षे झाली, माझ्या सोन्या, तू कुठं रे होतास?”

बन्सी हकीकत सांगू लागला. पण सांगताना तो इकडे तिकडे पाहू लागला. तो घरात जाऊ लागला, इतक्यात माजघरातून आई येत आहेसे त्याला वाटले. हर्षाने तो निर्भर होऊन गेला. पण ती पुढे येताच त्याचा हर्षवायू एकदम खाली आला; त्याचे रडे थांबले. बाप मात्र जास्तच रडू लागला.

बन्सीची आई काळसर, नाकाडोळ्यांनी तरतरीत व सडपातळ होती; पण ही पुढे आलेली स्त्री गोरी,



थबकट चेहऱ्याची व स्थूल होती. बन्सीने बापाकडे पाहिले आणि बाप भडभडून येऊन रडू लागला.

जीविताच्या नश्वरतेची ओळख लहान मुलांनासुद्धा असते, अर्थातच बन्सीच्याने बापाला काही विचारवेना. आपण आता आईवीण झालो असे त्यास वाटू लागले. पण लेकापेक्षा बापच जास्त रडत राहिला. मंगलदेवी बिचारी डोळे पुशीत आत गेली.

*

बापाने बन्सीसाठी सगळे काही केले. आंघोळीला, जेवायला, खायला तो त्याला बरोबर घेई. रात्री तो त्याला आपल्याजवळ निजावयास घेई. बापाचा हात उराशी घेऊन बन्सी झोपी जाई. झोपेत तो ‘बेम्ट्या, पवळ्या’ अशा हाका मारी.

आपल्या मुलाला कोणत्या लोकात दिवस घालवावे लागले हे पाहून जयपाळाला भारी वाईट वाटे. मंगलदेवीही त्याला बरे करी. एके दिवशी अपरात्री नवरा बायकोचे बोलणे चालले होते. बन्सी डोळे मिटून पडला होता, पण जागा होता.

जयपाळ म्हणाला, “माझं पोर तिनं घालविलं; माझ्या अंगाचा संताप झाला. जत्रेला त्याला घेऊन

जाऊ नकोस म्हटलं; पण हट्टानं घेऊन गेली. अन् पोर कुठं तरी चुकलं म्हणून मी तिला हाकलून दिलं. देवानं माझं पोर परत दिलं म्हणून बरं.''

''पण त्या आता कुठं असतील?''

''कुठं का असेना, ती मला मेली अन् मी तिला मेली. म्हणतात, कलेढोणला असते; मला तिच्याशी आता काही करायचं नाही. माझा बन्सी मला परत मिळाला आहे.''

हे बोलणे ऐकून बन्सीच्या चित्ताचा कांदा उन्मळून बाहेर आला. आपली आई मेली नाही हे पाहून त्याला आनंद वाटला; पण तिचा त्याग झालेला पाहून त्याला दुःख झाले.

बन्सीला सारी सुखे असूनही चैन पडेना. लेंगऱ्याच्या माळावरून झुकांडी देऊन इतकी पायपीट केली. बाबा भेटले खरे; पण बाबा आणि आई हवी होती. मंगलदेवीच्या तोंडाकडे पाहून तो रडू लागे.

बापाच्या पोटाशी असतानाही बन्सी बावरा दिसू लागला. गोड घासही त्याच्या तोंडात घोळू लागला. बाप घरी नसता तो भिंतीकडे तोंड करून बसू



लागला. एके दिवशी सकाळी उठून पाहतात तो बन्सी घरात नाही.

❋

कलेढोण गावच्या बाहेरच्या ओढ्यावर खूप बायका धुण्यापाण्याला जमा झाल्या होत्या. एरवी तोंडातून शब्द न काढणाऱ्या बायका अगदी मोकळेपणाने आणि मोठमोठ्याने बोलत होत्या. पाण्याचे लोट फुटलेल्या खडकातून फेसाळत आणि गजबज करीत चालले होते. धोतरांलुगड्यांना तडाखे देताना मधेच थांबून त्या विश्रांती घेऊन गुजगोष्टी तोंडी लावीत होत्या.

एकमेकींचे पाणी एकमेकींच्या अंगावर उडाले तरी, हसत खेळत त्यांनी धुण्याचा सपाटा चालविला होता. खेडेगावच्या पद्धतीप्रमाणे निरनिराळ्या बाया आपापल्या पाणवठ्यावर धूत होत्या.

एक जण म्हणाली, ''ती परदेशी माणसं आहेत.''

''होय,'' दुसरी म्हणाली.

''पण ती त्याची बायको नव्हे, म्हणे.''

''म्हणतात बाई, की ती आपली तशीच त्याच्यापाशी राहिली आहे!''

“इश्श! काही तरी बोलता आहा तुम्ही. मला चांगली म्हणाली परवा, की ‘आम्ही नवराबायको आहोत’ म्हणून.”

“असतील बाई! पण ऐकल्यापासून मी काही पाणी घेत नाही तिचं.” असा कुजबुजीचा प्रकार चालू होता; व पलीकडच्या खडकापाशी झरा काढीत असलेल्या एका बाईकडे त्या मधूनमधून पाहात होत्या.

ती बाई काळसर, नाकाडोळ्यांनी तरतरीत आणि सडपातळ होती. पण तिचा चेहरा थोडा फिकट झालेला दिसत होता. वाळूत झरा काढून झाला. तिने दोनदा त्याचे पाणी झाडले, अजून स्वच्छ येईना म्हणून ती पुन्हा झाडू लागली.

उडणारे पाणी लांबच्या खडकावर अंग घाशीत बसलेल्या एका पोराच्या अंगावर उडू लागले. तो मुलगा तेथून उठून जरा दूर जाऊन अंग धुऊ लागला. तो तिच्याकडे बारकाईने पाहात होता.

ती मात्र मन लावून झरा झाडीत होती. होता होता तिने स्वच्छ पाण्याने घागर भरली. तिकडे त्या मुलानेही आपले स्नान आवरले. घागर घेऊन आणि





खांद्यावर पिळे टाकून बाई घराकडे निघाली. मुलगा मागून चालला.

पद्धतीप्रमाणे आयाबायांसाठी चमलदेवीने मागे पाहिले, बाया कोणीच येत नव्हत्या. पण एक मुलगा मात्र येत होता. तो तिच्याकडे आतुरतेने पाहात होता.

बाईने मागे पाहिले; तो येतच होता. जाता जाता चमलदेवीच्या खांद्यावरचा एक लहानसा पिळा पडला. ती मागे वळते तो मुलाने तो उचलला.

ती म्हणाली, "का रे उचललास? आण इकडे."

जवळून त्याला पाहताच चमलबाईचे चित्त एकदम गडबडले. तेच त्याच्या गालावरचे ल्हासे; तेच त्याचे तेजःपुंज डोळे. ओरखडा असला तरी तीच त्याची चिंचोळी गोजिरवाणी हनुवटी; तिच्या स्तनांच्या ओळखीचे झालेले तेच त्याचे पाकळीसारखे ओठ.

बन्सीचे डोळे डबडबून भरले. "आई आई," तो म्हणाला, "पिळा मी घेतला म्हणून काय ग झालं!"

चमेलीने घागर टाकून दिली आणि दोनही हात पसरून त्या आपल्या परागंदा झालेल्या लेकराला तिने पोटाशी कवटाळून घेतले. तिने त्याचे मस्तक हुंगले आणि ते अश्रूंनी भिजवून सोडले. बन्सीने आईच्या



कमरेला मिठी घातली होती. "माझ्या सोनुकल्या? इतके दिवस कुठे रे होतास?"

ती दोघे भर सडकेच्या काठी खाली बसली. मायलेकरे दुःखाने व्याप्त, पण आनंदाने तृप्त झाली. मागून येणाऱ्या आयाबाया जवळ येण्याच्या आतच ती उठली व बन्सीला तिने घरी नेले. तिची गती थोडी मंद झाली होती.

कुलूप काढून ती घरात गेली. बन्सीच्या झोळीतले तुकडे तिने फेकून दिले; त्याच्या अंगाभोवती तिने एक शाल गुंडाळली; मोहनलालच्या संध्याकाळच्या न्याहारीसाठी केलेला मालपुवा तिने त्याच्यापुढे ठेवला; आणि प्रेमातिरेकाने ती त्याच्या तोंडाकडे पाहात बसली.

❋

बन्सीने सगळी हकीकत सांगितली. सांगोल्यास काय झाले तेही सांगितले. सांगताना तो व ऐकताना ती सारखी रडत होती.

होता होता साडेपाच झाले. मोहनलाल घरी आला. चमलच्या पोटात धस्स झाले; तिचा चेहरा खर्रकन उतरला. ती गांगरल्यासारखी करू लागली.

हातपाय धुऊन मोहन बाहेरच्या खोलीत जाऊन बसला. त्याने तेथूनच तिला खुणविले. ती तिकडे गेली. बन्सी बाहेर पडवीतच होता. मोहन शून्य नजरेने कोपऱ्यात पाहात होता. चमेलीचे ढसाढस रडणे बन्सीला ऐकू येऊ लागले. मोहन खिन्न तोंडाने बाहेर पडला. बन्सीने त्याच्याकडे चोरदृष्टीने पाहिले.

पुष्कळ रात्र झाल्यावर मोहन घरी आला. श्रमलेला बन्सी झोपी गेला होता. चमेलीने त्याला पोटाशी घेतले होते.

कोंडलेल्या जागेत बन्सीला स्वस्थ झोप येत नसे. त्याने चाचपून पाहिले. पलीकडच्या खोलीत बोलणे ऐकू येत होते, पण कळत नव्हते. काही तरी तक्रार होती. बन्सीचे डोळे ताठ उघडले. अंधारातही त्याच्या बालबुद्धीला सगळे दिसून आले.

सकाळी चमेलीने मोहनला पाणी दिले. चमेलीने त्याच्या हातावर पाणी घातले. बन्सीच्या पोटात कसेसेच होऊ लागले. तिने त्याचा बिछाना गोळा केला. तिने अंगाला तेल लावले. बन्सीच्या गालफडातून पाणी सुटू लागले.

सबंध दिवसात मोहनने त्याच्याकडे ढुंकूनही पाहिले



नाही. चमेलीपासून मोहन दूरदूरच करीत होता. आईने बन्सीला पुन्हा पुन्हा जवळ घेतले, पण घेताना त्याच्या अंगाची ओढ लांब सरण्याची आहे, हे तिच्या ध्यानी आले. तिचे डोळे आसवांनी पुन्हा पुन्हा भरत.

आई जेवत नाही हे बन्सीने पाहिले होते. तिला ओकाऱ्या येत असत. पानात घातलेले गोडधोडही बन्सीच्या तोंडात घोळू लागले. तो तिच्या तोंडाकडे आशाळभूतपणाने पाही, खाली पाही व रडू लागे.

आसपासची माणसे त्यांच्याकडे कोणी फारशी येत नसत. पण कोणी कोणी कुचकुच करताना बन्सीने ऐकले होते. पंधरा दिवस गेले. एके दिवशी पाहतात तो बन्सी घरात नाही.

*

लेंगऱ्याच्या ओढ्यावरील माळाकडे बन्सी परत धापा टाकीत चालला होता. त्याच्या अंगावर अंगभर वस्त्र होते, पण ते धुळीने भरलेले होते. त्याच्या काखेत झोळी असून तीत चार वाळके तुकडे होते व हातात एक शिंकाळी केलेला गडू होता. त्यावर 'चमेली' अशी अक्षरे कोरली होती. मधून मधून तो पाणी पिई व पिताना त्या नावाकडे पाहून रडे.

माळ जवळ येत चालला तो तो त्याचे पाऊल हळू पडू लागले. माळावर खूप दंगल चालली आहे, असे दिसले. झोपड्या सगळ्याच्या सगळ्या विसकटल्या होत्या. गायी, म्हशी व गाढवे दोऱ्या लावून कोणी तरी दूर नेत होते.

बन्सी चपापून लांबूनच पाहू लागला. कोंबड्यांची खुराडी कोणी तरी पेटीत घालून चालविली होती पलीकडच्या शेतकऱ्यांच्या पाचसहा गाड्या माळावरून वळणावळणाने तेथे आणलेल्या होत्या व त्यांत ते झुळझुळीत मफलर, ते रंगीबेरंगी दुपेटे, त्या कातडी ट्रंका, काही वाकळा, कोरी इटॅलियन ब्लँकेटे असले सामान भरलेले होते, व हातात उंच उंच काठ्या घेऊन धिप्पाड रामोशी त्यांच्या शेजारी उभे होते.

बायकांचा एक मोठा थोरला तांडा मधे घालून काही जण त्यांना दरडावीत, हाकलीत नेत होते. बायका मोठमोठ्याने ओरडत, बोंबलत चालल्या होत्या. कुत्री नुसती आकाशाकडे बघून ओरडत भुंकत होती. बन्सीच्या चित्ताने ठाव सोडला.

पुरुष मंडळींभोवती शिपायांचे कडे पसरले होते व शेजारी घोड्यावर स्वार झालेला एक ढेरपोट्या



फौजदार उभा होता. सर्वांच्या हातात बेड्या व पायात दंडाबेडी घातलेली होती.

बन्सीने भयाने घुटका गिळला. हातात वेताच्या छड्या घेऊन दोन शिपाई टणक टणक अशा आठ-दहा पोरांना हाकलीत होते. बन्सीच्या छातीत धडधडू लागले. आईचा पाण्याचा गडू त्याने तोंडास लावला.

इतक्यात बायकांना नेणारे व सामानसुमान नेणारे निराळीकडे वळले; आणि बापई गड्यांना व पोरांना नेणारे बन्सीच्या बाजूने वळले. आपण कोणीकडे वळावे हे बन्सीला कळेना. भीती वाटली तरी त्याला तेथून दूर जाववेना.

हळूहळू पोरांचा तांडा समोरून जाऊ लागला. बेम्ट्या, पवळ्या हे सारे रडत भेकत चालले होते. त्यांना पाहताच बन्सी आक्रोश करू लागला. 'ए बंछी!' म्हणून ती सगळी पोरे ओरडली. शिपायांनी त्यांना दरडाविले.

बंछी म्हणाला, "ए पवळ्या, ए बेम्ट्या, अरे कुठं चालला? अरे तुळशीआई कुठं आहे?"

मागे वळून आक्रंदून ती म्हणाली, "तिला बी धरलीया."



"आई आई, एक तुळशीआई ए तुळशीआई!" बन्सी अगदी जीव पिळवटून ओरडला. गुडघ्यावर हात ठेवून तो ढसढसून रडू लागला.

इतक्यात ते चोरट्याचे मोठे टोळके आले. चिम्यासकट सारे त्यात होते. समोरून जाताना चिम्याने बन्सीला पाहिले. "ए हे, ए हे. माज्या धेवमनसा, ए बंछी, तू लांब जा, तू दूर जा; धेव तुला संबाळील."

शिपाई, फौजदार शंकित नजरेने हा प्रकार पाहू लागले.

चिम्या पुन्हा म्हणाला, "जा, तू धेवाच ल्योक आहेस; तू धेवाचा बाळ आहेस; तुज्या पायाला मी हात लावतो. आता तुला तुळशी आई न्हाई."

बेड्यांनी जखडलेले हात चिम्याने वर केले व त्याला नमन केले. शिपायांनी गुरकावून बन्सीला हाकून दिले; चिम्या त्याच्याकडे वळून पाहात होता.

*

संध्याकाळ होत आली आहे; बन्सी दमूनभागून ओढ्याच्या काठी बसला आहे; त्याचा बाप जयपाळ मंगलदेवीच्या संगतीत आपल्या घरी आहे; त्याची आई मोहनच्या संगतीत आपल्या घरी आहे.

पोरका-पोरका बन्सी ओढ्याच्या काठी बसला आहे. त्याची आई-तुळशीआई धरून नेलेली आहे. त्याचा बाप चिम्या जेलखान्याकडे चाललेला आहे; त्याच्यावर प्राणाप्रमाणे प्रेम करणारी त्याची भावंडे बेम्ट्या-पवळ्या पुण्याच्या पोरसुधारक संस्थेकडे चालली आहेत.

पोरका-टोरका बन्सी ओढ्याच्या कांठी बसला आहे. एक लांबोळे, चोपलेले रोडके कुत्रे त्याच्या शेजारी दोन पाय पसरून दीनवाणेपणाने त्याच्या तोंडाकडे पहात बसले आहे. माझ्या गोड बन्सीधरा! तू आता कुठे रे जाशील?

Printed by : Personal Graphics & Advertiser Pvt. Ltd., New Delhi